**राज्यातील खाजगी अंशत: व पुर्णत: अनुदानित, स्थानिक स्वराज्य संस्थेतील व अध्यापक विद्यालयातील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे माहे जून २०२० पर्यंतचे वेतन ऑफलाईन पध्दतीने वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन निर्णय क्रमांक : वेतन १२१८/प्र.क्र.२८/१८/टीएनटी-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १३ मे, २०२०

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र. वेतन १२१८/प्र.क्र. २८/१८, टिएनटी-३, दि. १४.२.२०२०
२) शासन शुद्धीपत्रक क्र. वेतन १२१८/प्र.क्र. २८/१८, टिएनटी-३, दि.१८.२.२०२०

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय दि. १४.२.२०२० व शासन शुद्धीपत्रक दि. १८.२.२०२० अन्वये, ज्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालार्थ क्रमांक दिलेला नसल्यामुळे अशा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे मार्च २०२० पर्यंतचे वेतन ऑफलाईन पद्धतीने अदा करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

तथापि, उपरोक्त कर्मचाऱ्यापैकी काही कर्मचाऱ्यांना अद्याप शालार्थ क्रमांक मिळालेले नसल्याने या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांचे जून २०२० पर्यंतचे वेतन ऑफलाईन पद्धतीने अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील खाजगी अंशत: व पुर्णत: अनुदानित, स्थानिक स्वराज्य संस्थेतील व अध्यापक विद्यालयातील खालील नमूद शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी ज्यांना अद्याप शालार्थ क्रमांक मिळालेला नाही अशा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना जून, २०२० पर्यंतचे वेतन ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यामध्ये खालील प्रकारच्या देयकांचा समावेश राहील.

१) दि. १३.३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये वैयक्तिक मान्यता दिलेल्या २७६ शिक्षकांचे व उच्च माध्यमिक शाळामधील पुरवणी मागणीद्वारे मान्य केलेल्या १७१ शिक्षकांचे वेतन.

२) दिनांक ६ फेब्रुवारी २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील खाजगी अनुदानित उच्च माध्यमिक व कनिष्ठ महाविद्यालयातील सन २००३-०४ ते २०१०-११ या वर्षातील उच्चस्तरीय समितीने मान्यता दिलेल्या १००० पदापैकी व्यपगत केलेल्या ४२८ पदापैकी पुनरूज्जिवित केलेल्या ६८ पदांचे वेतन.

३ ) दि. १ जुलै,२०१६ व दि. २ जुलै २०१६ च्या शासन निर्णयान्वये अनुदानासाठी पात्र घोषित केलेल्या एकूण ८९७० शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वेतन.

४) शासन निर्णय दि. १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये अनुदानास पात्र घोषित केलेल्या १६२८ शाळा, २४५२ तुकड्यावरील १९२४७ शिक्षक शिक्षकेत्तर कर्मचारी यांना अनुदान मंजूर केले असून त्यापैकी १२६६ शाळा व १६८० तुकड्यावरील प्रत्यक्ष अनुदान उपलब्ध करून देण्यात आलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांचे वेतन.

५) दि. ५.१.२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील पात्र ठरविलेल्या ३६ माध्यमिक शाळातील १८१ शिक्षक व १२७ शिक्षकेतर तसेच ११ माध्यमिक शाळांच्या तुकड्यावरील ४१ शिक्षक असे एकूण २२२ शिक्षक व १२७ शिक्षकेत्तर पदांना तसेच दि. २.८.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये पात्र ठरविण्यात आलेल्या प्रपत्र अ मधील १ माध्यमिक शाळेतील ५ शिक्षक व ३ शिक्षकेत्तर तसेच प्रपत्र ब मधील ६ माध्यमिक शाळांच्या तुकड्यावरील २४ शिक्षक असे एकूण २९ शिक्षक व ३ शिक्षकेतर कर्मचारी यांना दि. १ एप्रिल, २०१८ पासून २० टक्के अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे.

**२.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८/२०/कोषा प्रशा ४, दिनांक ११.०५.२०२० च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५१३१४४१०५८६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2020.05.13 14:44:36 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल मुंबई

२) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

३) अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) महालेखापाल, ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
५) महालेखापाल, ( लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी
७) आयुक्त ( शिक्षण ), महाराष्ट्र राज्य, पुणे
८) शिक्षण संचालक ( प्राथमिक ) , महाराष्ट्र राज्य, पुणे
९) शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) संचालक, विद्यापरिषद, पुणे
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१३) सर्व शिक्षणाधिकारी / शिक्षण निरीक्षक ( माध्यमिक / प्राथमिक )
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५) सर्व अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक (प्राथमिक/माध्यमिक)
१६) वित्त विभाग ( कोषा प्रशा -५ ), मंत्रालय, मुंबई
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अर्थसंकल्प कार्यासन / संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई
१८) निवड नस्ती-टिएनटी-३.